राष्ट्रीय सेवा योजना
**श्रीमती नवेली देशमुख यांची राज्याचे ग्राम सुधार सदिच्छादूत म्हणून नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१८/प्र.क्र.५५/१८/साशि-७**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ३१ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय सेवा योजनेच्या वतीने राबविल्या जाणा-या सामाजिक व शैक्षणिक उपक्रमांमध्ये युवकांना सहभागी करण्यासाठी आणि शासनाच्या योजनांचा प्रचार व प्रसार करण्यासाठी, महाराष्ट्र राज्याचे उच्च व तंत्र शिक्षण विभागातील राष्ट्रीय सेवा योजना या कार्यासनाच्या ग्राम सुधार सदिच्छादूत म्हणून, श्रीमती नवेली देशमुख यांची, विना मानधन तत्वावर शैक्षणिक वर्ष २०१७-१८ या वर्षासाठी, शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१८/प्र. क्र. ५५/१८/साशि-७, दि. ०६.०२.२०१८ अन्वये, प्रथमच नियुक्ती करण्यात आली होती. तथापि श्रीमती नवेली देशमुख यांना ग्राम सुधार सदिच्छादूत म्हणून मुदतवाढ देण्याचा मनोदय विचाराधीन होता. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे..

**शासन निर्णय:-**

श्रीमती नवेली देशमुख यांनी केलेले सामाजिक कार्य युवकांना प्रेरणादायी ठरण्यासाठी, राष्ट्रीय सेवा योजने अंतर्गत ग्राम सुधार सदिच्छादूत म्हणून, विना मानधन तत्वावर, शैक्षणिक वर्ष २०१८-१९ या कालावधीसाठी, श्रीमती नवेली देशमुख यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

ग्राम सुधार सदिच्छादूत श्रीमती नवेली देशमुख यांची व्याख्याने आयोजित करणे, विद्यार्थी व युवकांशी संवादाचे कार्यक्रम आयोजित करणे आणि त्या कार्यक्रमामध्ये शासनाच्या विविध योजना तसेच या कार्यासनाच्या दिनांक २६ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयानुसार राष्ट्रीय सेवा योजनेने हाती घेतलेले उपक्रम व उदिष्टे साध्य करण्यासाठी श्रीमती नवेली देशमुख सहकार्य करणार असून त्यासाठी आवश्यक निवास व प्रवासाची व्यवस्था करणे, इ. जबाबदारी संबधित विद्यापीठाची राहील. श्रीमती नवेली देखमुख यांच्याशी चर्चा करुन सर्व विद्यापीठातील अधीनस्थ महाविद्यालयातील विद्यार्थ्यांशी संवादाची, प्रचार व प्रसाराची आणि प्रत्यक्ष ग्राम सुधार उपक्रम आयोजित करण्याची जबाबदारी कार्यक्रम समन्वयक, तथा संचालक, राष्ट्रीय सेवा योजना यांची राहील. आखणी करण्याची जबाबदारी कार्यक्रम समन्वयक तथा संचालक, राष्ट्रीय सेवा योजना यांची राहील. राज्य संपर्क अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, राष्ट्रीय सेवा योजना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय कक्ष, हे नियंत्रक म्हणून काम पाहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१३११५०१५८७४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Atul Hansraj Salunke

Digitally signed by Atul Hansraj Salunke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=b264114e5f2ab2d209a59196e3eb37b12d34901b451d626c61cd53a462c38f25, serialNumber=6d891625fcc94630c100902f1322ae39cead880799263a1a29663e9104afe30b, cn=Atul Hansraj Salunke
Date: 2019.01.31 15:13:19 +05'30'

**( डॉ. अतुल हं. साळुंके )**
**राज्य संपर्क अधिकारी/ विशेष कार्य अधिकारी.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (उवतंशि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (उवतंशि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (उवतंशि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. सचिव (उवतंशि) यांचे स्वीय सहायक
७. सर्व अकृषि विद्यापीठाचे कुलगुरु
८. संचालक उच्च शिक्षण, पुणे
९. संचालक (व्यवसाय शिक्षण) संचालनालय, मुंबई
१०. संचालक (प्रशिक्षण) संचालनालय, मुंबई
११. संचालक तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई
१२. सर्व अकृषि विद्यापीठाचे कुलसचिव
१३. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण / व्यवसाय शिक्षण व प्रशिाण/तंत्र शिक्षण
१४. सहसंचालक, शिक्षण संचालनालय, उच्च शिक्षण, पुणे
१५. सर्व मंत्रालयीन विभाग
१६. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई
१७. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सह सचिव/उपसचिव
१८. श्रीमती नवेली देशमुख
१९. निवड नस्ती.